**१३ व्या वित्त आयोगांतर्गत उपलब्ध निधीमधून सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अंतर्गत विविध अधिकाऱ्यांकरीता ४६ नवीन वाहन खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२१/प्र.क्र.३३ /आरोग्य-७

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : ०२ मार्च, २०२२

वाचा :-

१. संचालक-२, आरोग्य सेवा, पुणे यांचे पत्र क्र.संआसे-२/१३ वा वित्त आयोग/पर्य.वाहन खरेदी/३०६९-७१/२०२२, दिनांक १५.०२.२०२२.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांची मान्यता प्राप्त टिप्पणी, दिनांक १०.०२.२०२२.
३. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.वाहन-२०१७/प्र.क्र.४१/१७/विनियम, दिनांक २८.०७.२०२०.

प्रस्तावना:-

१३ व्या वित्त आयोगांतर्गत उपलब्ध असलेल्या एकूण रु.५६.६४ कोटी इतक्या रकमेमधून विविध उपकरणे, यंत्र सामुग्री व साधन सामुग्री आणि वाहने खरेदी करण्याबाबत मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव १३ व्या वित्त आयोगांतर्गत गठीत करण्यात आलेल्या मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय संनियंत्रण समितीच्या दिनांक १६.११.२०२१ रोजीच्या बैठकीत सादर करण्यात आला होता.

०२. सदर उच्चस्तरीय संनियंत्रण समितीच्या बैठकीमध्ये वाहन खरेदी संदर्भात “आयुक्त, आरोग्य सेवा यांच्या अधिपत्याखालील विविध घटकांसाठी यापूर्वी मंजूर करण्यात आलेल्या वाहनांचा आढावा घेऊन ते निर्लेखित करुन फक्त निर्लेखित वाहनांच्या बदल्यात तेवढीच वाहने खरेदी करण्यास मान्यता देण्यात आली. उर्वरित वाहनांच्या बाबतीत वाहन आढावा समितीच्या मान्यतेसाठी प्रस्ताव सादर करावा. तसेच वाहन अनुज्ञेयताही तपासावी” असा निर्णय घेण्यात आला. त्यानुषंगाने दिनांक २८.१२.२०२१ रोजीच्या पत्रान्वये संचालक-२, आरोग्य सेवा आणि आयुक्त, आरोग्य सेवा यांना कळविण्यात आले होते.

त्यानुषंगाने संदर्भ क्र.१ अन्वये संचालक-२, आरोग्य सेवा, पुणे यांनी आयुक्त, आरोग्य सेवा यांच्या मान्यतेने आरोग्य विभागातील विविध ४६ अधिकाऱ्यांना निर्लेखित वाहनांच्या बदल्यात ४६ नवीन

वाहने १३ व्या वित्त आयोगांतर्गत उपलब्ध निधीमधून खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव सादर केला असून शासन मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संचालक-२, आरोग्य सेवा, पुणे यांनी प्रस्तावित केल्यानुसार आणि मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली दिनांक १६.११.२०२१ रोजीच्या उच्चस्तरीय संनियंत्रण समितीच्या बैठकीतील निर्णयानुसार १३ व्या वित्त आयोगांतर्गत उपलब्ध असलेल्या निधीमधून उपरोक्त नमूद केलेल्या एकूण ४६ अधिकाऱ्यांसाठी अनुज्ञेय असलेली (कार/ जीप प्रकारातील) निर्लेखित वाहनांच्या बदल्यात नवीन ४६ वाहने विहित पध्दतीने (निविदा प्रक्रिया किंवा GEM Portal द्वारे) खरेदी करण्यास व त्याकरीता प्रती वाहन रु.८.०० लक्ष प्रमाणे एकूण रु.३६८.०० लक्ष इतक्या रकमेस पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) सदर वाहनांची खरेदीची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया/ GEM Portal वर राबविण्यात यावी.

२) सदरहू वाहनांची खरेदीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. पीआयपी मध्ये मंजूर असलेल्या बाबींच्या तांत्रिक विर्निदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुखांची राहील. प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबींचीच खरेदी करण्यात यावी अथवा GEM Portal वर खरेदी प्रक्रिया राबवावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) सदर वाहन खरेदी करताना वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वाहन-२०१७/प्र.क्र.४१/१७/विनियम, दिनांक २८.०७.२०२० अन्वये शासकीय वाहनांची किंमत मर्यादा धोरणाची पूर्तता होईल याची खात्री करावी.

५) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या वाहनांची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वाहनांची खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

७) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

८) सदरहू खरेदीसाठी होणारा खर्च १३ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनूसार केंद्र शासनाकडून राज्य शासनास प्राप्त झालेल्या निधीतून भागविण्यात यावा. सदरची खरेदी प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

९) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

१०) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

११) उपरोक्त तक्त्यातील अ.क्र.६ मधील बाबीसाठी शासनाच्या वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय व सूचना याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

१२) सदर वाहने खरेदी १३ व्या वित्त आयोगांतर्गत प्राप्त अनुदानाच्या विनियोगासाठी गठीत मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १६.११.२०२१ रोजीच्या बैठकीतील निर्णयाच्या अनुषंगाने निर्लेखित वाहनांच्या बदल्यात नवीन वाहने खरेदी करण्यास शासन मान्यता देण्यात येत असून वाहनांच्या निर्लेखनाची खातरजमा आरोग्य सेवा आयुक्तालयाने करावी. तसेच सदर वाहने खरेदी करताना वाहनाच्या प्रकाराबाबत अनुज्ञेयता तपासावी. त्याचप्रमाणे या वाहनांकरीता नवीन वाहनचालकांची पदे मंजूर करण्यात येत नसून आहे त्या मंजूर पदांचा त्यासाठी वापर करावा.

१३) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.सदर प्रकरणी सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी -

२०१६/प्र.क.२४०/आरोग्य-८ दिनांक २६ जुलै,२०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

**०२.** उपरोक्त अनुक्रमांक १ ते १३ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, संचालक, आरोग्य सेवा संचालनालय व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

०३. सदर शासन मान्यता ही १३ व्या वित्त आयोगांतर्गत प्राप्त निधीच्या विनियोगासाठी मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील गठीत उच्चस्तरीय संनियंत्रण समितीच्या दिनांक १६.११.२०२१ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार देण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संकेताक २०२२०२२३१९५५११४०१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.03.02 15:18:04 +05'30'

**(वि. ल. लहाने)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक-१/ संचालक-२, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई/ पुणे.
३) अतिरिक्त संचालक (आरोग्य सेवा), राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
४) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
५) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
६) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
७) उपसंचालक (परिवहन), आरोग्य सेवा, पुणे
८) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
९) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
१०) निवडनस्ती (आरोग्य-७)